**मालमत्ता क्र.४८(७ अेअे ६८/९४ ओ),४८(५८७ ओ) ४ अे,जी/एस वॉर्ड,क्लार्क रोड (केशवराव खाडये मार्ग), जेकब सर्कल, मुंबई ११ (देयक क्र.जी/ दक्षिण-१४-०२६६-००-३,जी/द-१४-०२६८-००-६) या मालमत्तेस दुरुस्ती उपकरातून सूट देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग,**
**शासन निर्णय क्र.ईएक्सएम-२००९/प्र.क्र.७७/दुवपु.१,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ११ मे, २०१५

**वाचा :-** १) सहाय्यक करनिर्धारक व संकलक, जी दक्षिण विभाग, बृहन्मुंबई महानगरपालिका यांचे क्र.सहा.कवसं/जीद/२०१/२०१०-११, दि.७.५.२०१० चे पत्र.

२) मुख्य अधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ यांचे जा.क्र.मुलेअ/दुवपु/टे.क्र.१५/नक्रजीएस-१६५/२२७/११, दि. २४.३.२०११ चे पत्र.

**शासन निर्णय**

इमारत क्र. ४८(७ अेअे ६८/९४ ओ),४८(५८७ अेओ) ९४ अे,जी/एस वॉर्ड,क्लार्क रोड (केशवराव खाडये मार्ग), जेकब सर्कल, मुंबई- ११(देयक क्र.जी/दक्षिण-१४-०२६६-००-३, जी/द-१४-०२६८-००-६) ही मालमत्ता म्हणजे एक प्रार्थना मंदिर असून पुर्णत: अनिवासी वापरात असल्याने महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास अधिनियम, १९७६ च्या कलम ८३(१) (एफ) व (जे) मधील तरतूदीनुसार दुरूस्ती उपकरातून सूट मिळण्यास पात्र आहे. उपकरप्राप्त इमारतींच्या मालकाने/भाडेकरूंनी उपकरातून सूट मिळण्याबाबत शासनाकडे अर्ज केल्यास व ती इमारत दुरूस्ती उपकरातून सूट मिळण्यास पात्र असेल तर अशी सूट त्यासाठी शासनाकडे करण्यात आलेल्या अर्जाच्या दिनांकापासून देण्यात यावी, असा निर्णय मा.मुंबई उच्च न्यायालयाने रिट याचिका क्र.४०२७/१९८७ पर्ल मॅन्शन को.ऑप. हाऊसिंग सोसायटी विरूध्द बृहन्मुंबई महानगरपालिका व रिट याचिका क्र.१६२४/१९९, प्रागजी वृंदावन प्रिमायसेस को.ऑ.हौ.सो. विरुध्द महाराष्ट्र शासन या दाव्यात दिलेला आहे.

अध्यक्ष/सचिव, दि तिफेरेथ इस्त्रायल सायनागोज (THE TIPHERETH ISRAEL SYNAGOGUE) यांनी सदर मालमत्तेस दुरुस्ती उपकरातून सुट मिळणेबाबत या विभागास पाठविलेल्या सन २००५ च्या पत्रावर दिनांक नमूद केलेला नाही. त्यांच्या दि.१२.६.२००८ च्या पत्रासोबत प्रस्तावाशी संबंधित आवश्यक सर्व कागदपत्रे या विभागास सादर केल्याचे दिसून येते. सबब, दि तिफेरेथ इस्त्रायल सायनागोज (THE TIPHERETH ISRAEL SYNAGOGUE) यांनी प्रस्तावाशी संबंधित आवश्यक कागदपत्रांची पुर्तता केल्याच्या दिनांकापासून म्हणजेच दि.१२.६.२००८ पासून इमारत क्र.४८(७ अेअे ६८/९४ ओ),४८(५८७ अेओ) ९४ अे,जी/एस वॉर्ड,क्लार्क रोड (केशवराव खाडये मार्ग), जेकब सर्कल, मुंबई -११ (देयक क्र.जी/दक्षिण-१४-०२६६-००-३, जी/द-१४-०२६८-००-६) या मालमत्तेस उपकरातून सुट देण्यात येत आहे. सदर मालमत्तेवरील उपकराच्या थकीत रकमांची वसुली करण्यात यावी, तसेच यानंतर या मालमत्तेच्या दुरुस्तीची जबाबदारी मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळाची न राहता ती दि तिफेरेथ इस्त्रायल सायनागोज या संस्थेची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov,in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१५०५१११५०५५१२२०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant P Badgeri

Digitally signed by Prashant P Badgeri
DN: CN = Prashant P Badgeri, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.05.11 15:06:42 +05'30'

**(प्र.पु.बडगेरी)**
अवर सचिव, गृहनिर्माण विभाग

**प्रत,**

१. उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई ५१.
२. मुख्य अधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई ५१.
३. सहाय्यक करनिर्धारक व संकलक,जी/एस वॉर्ड, बृहन्मुंबई महानगर पालिका, ना.म.जोशी मार्ग, मुंबई १३.
४. मुख्य लेखा अधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुनर्रचना मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई ५१.
५. सेक्रेटरी,दि तिफेरेथ इस्त्राएल प्रार्थनालय, ०२ केशवराव खाडये मार्ग, पोस्ट ऑफिसजवळ,जेकब सर्कल, मुंबई ११.
६. निवड नस्ती, (दुवपु-१ कार्यासन)